**नवी मुंबई महानगरपालिकेच्या आस्थापनेवरील डॉ. प्रशांत श्रीधरराव जवादे, यांच्या 'वैद्यकीय आरोग्य अधिकारी' या पदावरील पदोन्नतीस, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५(४) नुसार शासन मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक:- नमुंम-१२२४/ सं. क्र.२२/प्र. क्र. २१/नवि-२८**
मंत्रालय (मुख्य इमारत), ४ था मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०७.०६. २०२४

**संदर्भ:-** १) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.नमुंम-१२१५/३९४/प्र.क्र.१६/१५/नवि-२८, दि.२१.०८.२०१७.
२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. नमुंम-१२१९/प्र.क्र.१३७/नवि-२८, दि.०९.०४.२०२१.
३) आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचे पत्र क्र. नमुंमपा/प्रशासन/आस्था-२ / प्र.क्र.१५०/३९६४/२०२३, दि.१३.१२.२०२३

**<u>प्रस्तावना</u>-**

नवी मुंबई महानगरपालिकेचा आकृतीबंध दि.२१.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये मंजूर केलेला आहे. तसेच, नवी मुंबई महानगरपालिका सुधारित सेवा (सेवाप्रवेश व सेवांचे वर्गीकरण) नियम, २०२१ ला दि.०९.०४.२०२१ च्या अधिसूचनेन्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यास अनुसरून दि.२८.०८.२०२३ रोजीच्या बैठकीत पदोन्नती निवड समितीने केलेल्या शिफारशीनुसार व दि.१३.०९.२०२३ च्या प्रशासकीय ठराव क्र. ५०६० नुसार दि.१५.०९.२०२३ च्या आदेशान्वये, डॉ. प्रशांत श्रीधरराव जवादे, 'वैद्यकीय अधिक्षक' यांना, जेष्ठतेनुसार खुल्या प्रवर्गात निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७, तसेच, दि.०७.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णय प्रकरणी, मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल केलेल्या याचिकेवरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून 'वैद्यकीय आरोग्य अधिकारी' या पदावर पदोन्नती देण्यात आलेली आहे. या पदोन्नतीस/पदस्थापनेस, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५(४) नुसार, शासन मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव दि.१३.१२.२०२३ च्या पत्रान्वये, आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांनी शासनास सादर केला आहे.

२. डॉ. प्रशांत श्रीधरराव जवादे यांच्या 'वैद्यकीय आरोग्य अधिकारी' या पदावरील पदोन्नतीस शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

आयुक्त, नवी मुंबई महानगरपालिका यांचेकडून संदर्भीय दि.१३.१२.२०२३ च्या पत्रान्वये प्राप्त प्रस्ताव, नवी मुंबई महानगरपालिका पदोन्नती समितीने दि.२८.०८.२०२३ रोजी केलेल्या शिफारशीनुसार, दि.१५.०९.२०२३ च्या आदेशान्वये, डॉ. प्रशांत श्रीधरराव जवादे, 'वैद्यकीय अधिक्षक' यांना, जेष्ठतेनुसार खुल्या प्रवर्गात निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात, मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुमती याचिका क्र. २८३०६/२०१७, तसेच, दि.०७.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णय प्रकरणी, मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल केलेल्या याचिकेवरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून 'वैद्यकीय आरोग्य अधिकारी' या पदावरील केलेल्या पदोन्नती / पदस्थापनेस, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील कलम ४५(४) नुसार, शासन मंजुरी देण्यात येत आहे.

**२.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०६०७१४३६४९२९२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUSHILA
DHONDIRAM PAWAR

Digitally signed by SUSHILA DHONDIRAM PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=be0660f27b88fa30c14d66b8296a2c28478562c6fd9d1d360094fe11409501d5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2D78E8AB53FB3619E69D852CE1492593ABC1DCE1DF4E081AFE790194FB65C97B, cn=SUSHILA DHONDIRAM PAWAR
Date: 2024.06.07 14:49:39 +05'30'

**( सुशिला पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) आयुक्त तथा प्रशासक, नवी मुंबई महानगरपालिका, जि. ठाणे.
३) प्रधान सचिव (नवि-२) महोदयांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) उप सचिव (नवि-२८), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) निवडनस्ती नवि-२८